गडचिरोली जिल्ह्यातील पोलीस शिपाई, पोलीस शिपाई चालक संवर्गाची रिक्त असलेली पदे भरण्यासाठीची भरती प्रक्रिया TCS, IBPS , MKCL यांचेमार्फत न करता ती पोलीस घटकाच्या स्तरावर करणेबाबत...

# महाराष्ट्र शासन
# गृह विभाग

**शासन निर्णय क्रमांकः पोलीस-११२२/प्र.क्र.२४/पोल-५अ**

मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२
दिनांक : २२ मार्च,२०२२

वाचा :-

**१) शासन पत्र क्रमांक- पोलीस १८१९/प्र.क्र.२३९ (भाग-१)/ पोल-५अ, दि.०७.०८.२०२१**
**२) सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्रमांक- बीसीसी-२०२०/प्र.क्र.१५३/१६-ब, दि.०३.०१.२०२२**
**३) सामान्य प्रशासन विभाग (माहिती तंत्रज्ञान), शासन निर्णय क्रमांक - मातंसं-२०२२/प्र.क्र.०१/ से-२/३९, दि.१८.०१.२०२२**
**४) अपर पोलीस महासंचालक, प्रशिक्षण व खास पथके, महाराष्ट्र राज्य,मुंबई यांचे पत्र क्र. अपोमसं/प्रशि पो.शि.भरती-प्रक्रिया २०२१/१८८/२०२१/२०१७,दि.२१.०१.२०२२**

प्रस्तावना :-

पोलीस अधीक्षक, गडचिरोली यांच्या आस्थापनेवरील दि.३१.१२.२०२० अखेरपर्यंत रिक्त असलेली ३११ पदे (१५० पोलीस शिपाई व १६१ पोलीस शिपाई चालक ) आणि समादेशक, राज्य राखीव पोलीस बल गट क्र.१३ देसाईगंज, गडचिरोली येथील रिक्त असलेली १०५ पदे अशी एकुण ४१६ पदे १०० % भरण्यास संदर्भ क्र.१ येथील पत्रान्वये शासन मान्यता देण्यात आली आहे. तथापि, गडचिरोली जिल्ह्यातील रिक्त पदे भरण्यासाठी बिंदुनामावली विहित करण्यात आली नसल्याने सदर पदे भरण्यासाठीची भरती प्रक्रिया घेण्यात आली नव्हती. सदर बिंदुनामावली सामान्य प्रशासन विभागाच्या संदर्भ क्र.२ येथील दि.०३.०१.२०२२ रोजीच्या शासन निर्णयान्वये विहित करण्यात आली आहे.

मा. मंत्रिमंडळाच्या दि.१५.१२.२०२१ रोजीच्या बैठकीमध्ये मा. मंत्रिमंडळाने पदभरतीसाठी घेण्यात येणा-या परिक्षेसाठी असलेल्या कंपन्यांचे पॅनल स्थगित केले असून यापुढे होणा-या परिक्षा TCS, IBPS आणि MKCL यांच्यामार्फत घेण्याचे निर्देश दिले असून त्यानुसारच्या सूचना सामान्य प्रशासन विभाग (माहिती तंत्रज्ञान) यांनी संदर्भ क्र. ३ येथील दि.१८.०१.२०२२ रोजीच्या शासन निर्णयान्वये दिल्या आहेत. तथापि, गडचिरोली जिल्ह्यातील रिक्त पदे तातडीने भरणे आवश्यक असल्याने गडचिरोली जिल्हातील पोलीस शिपाई, पोलीस शिपाई चालक इ. रिक्त पदे भरण्याची प्रक्रिया थेट पोलीस घटक स्तरावरुन राबविण्यास मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

पोलीस अधीक्षक, गडचिरोली यांच्या आस्थापनेवरील दि.३१.१२.२०२० अखेरपर्यंत रिक्त असलेली ३११ पदे (१५० पोलीस शिपाई व १६१ पोलीस शिपाई चालक) आणि समादेशक, राज्य राखीव पोलीस बल गट क्र.१३ देसाईगंज, गडचिरोली येथील रिक्त असलेली १०५ पदे अशी एकुण ४१६ पदे भरण्याची प्रक्रिया सामान्य प्रशासन विभाग (माहिती तंत्रज्ञान) यांच्या संदर्भ क्र.३ येथील शासन निर्णयातून वगळण्यात येत असून सदर पदे भरण्यासाठीची भरती प्रक्रिया TCS, IBPS, MKCL यांचेमार्फत न राबविता ती थेट पोलीस घटक स्तरावरुन राबविण्यास विशेष बाब म्हणून शासन मान्यता देण्यात येत आहे.

२. सदर मान्यता ही फक्त सन २०१९ च्या पदभरतीसाठीच अनुज्ञेय राहील.

३. उपरोक्त मान्यतेच्या अनुषंगाने रिक्त पदे भरण्याबाबत अपर पोलीस महासंचालक,प्रशिक्षण व खास पथके यांनी आवश्यक ती कार्यवाही तात्काळ करावी.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२२०३२२१२२७३०२८२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

ANIL EKNATH KULKARNI

Digitally signed by ANIL EKNATH KULKARNI
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HOME DEPARTMENT,
2.5.4.20=a68ace8f470aec5d6a18e832ae4a8b4d7804aba280ecdb8c3db114bd3cb1c2ac, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=04A7B4319163F6C965DD5CCDF92A74288C731F37328C1327B237008EB8DDC2D4, cn=ANIL EKNATH KULKARNI
Date: 2022.03.22 12:29:11 +05'30'

**(अ.ए. कुलकर्णी)**
**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा.मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन,मंत्रालय,मुंबई
२. मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय,मुंबई
३. मा. मंत्री (गृह) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय,मुंबई
४. मा. राज्य मंत्री (शहरे/ग्रामीण) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय,मुंबई
५. पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य,मुंबई
६. अपर पोलीस महासंचालक, प्रशिक्षण व खास पथके, महाराष्ट्र राज्य,मुंबई
७. पोलीस अधीक्षक, गडचिरोली
८. समादेशक, राज्य राखीव पोलीस बल गट क्र.१३ देसाईगंज, गडचिरोली
९. महालेखापाल ( लेखापरीक्षा/लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र, १/२, मुंबई /नागपूर
१०. निवासी लेखा परीक्षा अधिकारी,मुंबई

११. अधिदान व लेखा अधिकारी,मुंबई
१२. सह/उप सचिव,सामान्य प्रशासन विभाग (माहिती व तंत्रज्ञान), मंत्रालय,मुंबई
१३. सह/उप सचिव, सामान्य प्रशासन विभाग,मंत्रालय,मुंबई
१४. निवडनस्ती (पोल-५अ)